शिसोद्यांची गादी चितोडगडच होय. पूर्वीच्या दोन याद्यांत याचें गोत्र कौशिक दिलें आहे. हें गोत्र मूळ शिसोद्यांचें नव्हे. महाराष्ट्रांत विज्ञानेश्वराच्या मिताक्षरे-प्रमाणें ( इ. ११०० सु. ) क्षत्रियांना गोत्र नाहीं, त्यांनीं पुरोहितांचें गोत्र घ्यावें असा सिद्धांत चुकीचा प्रचलित झाला त्यामुळें भोसले महाराष्ट्रांत येऊन राहिले, तेव्हां त्यांचे प्रथम पुरोहित कौशिक गोत्राचे असावे आणि म्हणून हें गोत्र चालू झालें, तें शाहूमहाराजांच्या लेखांतहि नमूद आहे. भोसल्यांचे पुरोहित राजोपाध्ये हे मागूनचे ठरतात, कारण त्यांचें गोत्र कौशिक नाहीं. भीमथडी प्रांतांत भोसल्यांची वस्ती झाली त्यावेळचे हे उपाध्ये असावेत. कारण पेडगांवा-जवळच आरवी हा राजोपाध्यांचा मूळ गांव भीमातीरीं आहे. तेथें मुद्गलेश्वराचें प्रसिद्ध स्थान आहे हें ध्यानांत येतें.

गैज. यावरून मराठे लोक गांवच्या पाटिलकीबद्दल कसे प्राण देत हें दिसतें. भोसल्यांना वेरूळ प्रान्तीं पाटिलक्या दुर्गादेवी दुष्काळानंतर सहज मिळाल्या पण भिमथडी प्रांतांत त्यांनीं पैशाच्या आणि फौजबंदीच्या जोरावर निजामशाही आमदानींत मिळविल्या. कित्येक मुकासे सरकारांतून फौजेच्या खर्चास मिळालेले दिसतात. राजवाडे खण्ड १५ ले. ३६८ मध्यें मालोजी व विठोजी यांस सरगुन्हो म्हटलें असून कित्येक गांव 'दरवजे मुकासा' दिले असल्याचा दाखला आहे. सरगुन्हो हा शब्द "गिरोह" म्हणजे जमाव त्याचा मुख्य अर्था अर्थाचा असून सरकारी फौजेचा अधिकारी अशा अर्थाचा वाचक नाहीं. पाश्चात्य देशांतील (Feudal System) किंवा इकडील सरंजामी व्यवस्थेनुरूप आपली फौज ठेवून सरकारी नोकरी करणाऱ्या लोकांपैकीं मालोजी भोसले होता व तिच्या खर्चाकरितां हे गांव तैनात केले होते. हीं गांवें नगर जिल्ह्यांतील व हल्लींच्या मोगलाईंतील म्हणजे पूर्वींच्या निजामशाहींतीलच आहेत. ले ३६८, ३६९, ३७०, ३७१ खं. १५ यांत दिलेली, पैठण तालुक्यांतील व अहमदाबाद कसबे आधारसूळ परगने फत्तराड देखील जातेगों (किल्ले व कोट सुद्धां) गौडगों (गाऊ) वगैरे आहेत. यावरून निजामशाहींत मराठे सरदारांचा किती मान होता व त्यांतहि मालोजी भोसले याचा किती होता ही गोष्ट व्यक्त होते. हल्लींहि भोसल्यांचीं कित्येक गांवें जिंती, शेडगांव वगैरे या प्रांतांत आहेत.

सुर्शूसरिदी पेशजी निमे व हली (आपण दिधली नि) मी यर्स दरोबस्त मोकदमी नाव नागर व कुल बाब हक दक मान मानूक कम्रे मारीची तुम्हास दिली आसे त्यास तुम्हांपासोन आपण खुशरजा होन १२०० बाराशें रोख घेतले व घोडी एक घेतली आणि सदरहू खरीदपत तुम्हास लेहून दिल्ही असे तुझी करने मारी घर वाडा बाघोन मोकदमी लेकराचे लेकरी खाणे आपण खुशरजा वतन दिल्हे आसे त्यास कोणी आपले भाउबंद काकहे नोदीगर गोष्टी सागेल तरी ती बातिल आसे त्यास कुलस्वामीची व पूर्वजाची अणिगा आसे व वाराणसीस गोहत्या व ब्रह्महत्या केल्याची आण आसे हे खरीदपत लिहून दिले सई देखील ×× हली वही आसलच्या येकूनतीस

निा गणेश बिनायक कुलकर्णी

साकई थाई काकडी काम्रे मार
नरसोजी सोवजी झारक चोगुले

महादजी शटी बिन दम शट भोसले को मार
लखमोजी बिन रामजी सर्जेराव चोगुले
को मार

बाबे भुतजी काकडे चोगुले
को मार

रस्तम नाक बिन क ... नाक महार
को मार